**धुळे येथील वनविभागासाठी प्रशासकीय इमारत वनभवन इमारतीचे बांधकाम करण्यासाठीच्या <u>अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत..</u>**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०१६/प्र.क्र.५०२/फ-९**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- ३१ मार्च, २०१७**

**<u>वाचा</u> :-** अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र. कक्ष २४(३)/वअ/७७४/२०१६-१७, दिनांक ३०.११.२०१६ चे पत्र.

**<u>प्रस्तावना</u> :-**

धुळे येथील वनविभागासाठी प्रशासकीय इमारत वनभवन इमारतीचे बांधकाम करण्यासाठी रू. २३८४.०० लक्ष रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २१.३.२०१७ रोजी झालेल्या बैठकीत धुळे येथील वनविभागासाठी प्रशासकीय इमारत वनभवन इमारतीचे बांधकाम करणेकरिता सचिव समितीने सदर प्रस्तावाच्या रू. २१०२.१५ लक्ष (रूपये दोन हजार एकशे दोन लक्ष मात्र) एवढया किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत सहमती दर्शविलेली आहे.

त्यानुषंगाने, धुळे येथील वनविभागासाठी प्रशासकीय इमारत वनभवन इमारतीचे बांधकाम करण्यासाठी रू. २१०२.१५ लक्ष अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने सोबत जोडलेल्या प्रपत्रानुसार व नमुद केलेल्या अटीच्या अधीन राहून शासनाची प्रशासकीय मान्यता **(<u>वित्तीय मान्यता वगळून</u>)** देण्यात येत आहे :-

१. सदर काम जर अर्थसंकल्पाव्यतिरिक्त करावयाचे झाल्यास त्यात ४% सेंटेज चार्जेसची तरतूद मिळविण्यात यावी.
२. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय दिनांक ८.७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.
३. काम सुरु करण्यापुर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
४. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजुर करुनच काम हाती घ्यावे.
५. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग शासन निर्णय क्र.इएनव्ही/२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१ दि.१० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

६. वनसंवर्धन अधिनियम, १९८० अंतर्गत पूर्व मंजूरी घेण्यात यावी. त्याचप्रमाणे बांधकामासाठी आवश्यक असलेल्या सर्व परवानग्या घेण्यात याव्यात.

हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र. ७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०३१७१९३५८४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2017.04.03 17:25:38 +05'30'

**(प्रकाश महाजन)**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), धुळे.
४. उप वनसंरक्षक (प्रा.), धुळे.
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-१), मंत्रालय, मुंबई-३२.
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
९. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)